अर्थसंकल्पीय अनुदान २०२३-२०२४ मागणी क्र. वाय-०४, २७०२ लहान पाटबंधारे भूजल संपत्तीचे अन्वेषण व विकास आस्थापना (योजनेत्तर) (२७०२ ३९१८)

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-१६२३/प्र.क्र.१२०/पापु-१५
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल,
क्रॉफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय इमारत, मुंबई-४०० ००१.
तारीख: २० जून, २०२३

वाचा -

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः बीयुडी-१६२३/प्र.क्र.१२०/पापु-१५, दि१३.०४.२०२३
२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः बीयुडी- १६२३/ प्र.क्र.१२०/पापु-१५, दि. १२.०५.२०२३

प्रस्तावना

सन २०२३-२०२४ या आर्थिक वर्षात भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेच्या आस्थापनेचा खर्च भागविण्यासाठी "मागणी क्रमांक वाय-०४, २७०२ लहान पाटबंधारे, (०२) भूजल, (००५) अन्वेषण, (०१) संपत्तीचे अन्वेषण व विकास आस्थापना, (०१)(०१) भूजल संपत्तीचे अन्वेषण व विकास आस्थापना (२७०२ ३९१८)(अनिवार्य)"या लेखाशीर्षाखाली रू. ५८,०५,८१,०००/- इतकी अर्थसंकल्पीय तरतुद करण्यात आली आहे. त्यापैकी आतापर्यंत एकूण ११,४७,४८,६००/- इतके अनुदान संदर्भाधिन क्र.१ व २ अन्वये अर्थसंकल्प अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवर (बीम्सवर) आतापर्यंत वितरीत करण्यात आले आहेत. सदर लेखाशीर्षाखाली चालू आर्थिक वर्षातील पुढील कालावधीचा खर्च भागविण्यासाठी आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना अनुदान उपलब्ध करून देण्याची बाब विचाराधीन होती.

शासन निर्णय-

सन २०२३-२०२४ या आर्थिक वर्षात भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेचा आस्थापना व इतर अनुषंगिक बाबींवरील खर्च भागविण्यासाठी पुढील विवरणपत्रात स्तंभ-५ मध्ये दर्शविल्याप्रमाणे एकूण रू. २,२३,३०,०००/- (रूपये दोन कोटी तेवीस लाख तीस हजार फक्त) इतके अनुदान आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना या शासन निर्णयाद्वारे मुक्त करण्यात येत आहे.

(रूपये हजारात)

| अ.क्र. | उद्दिष्ट | वित्तीय वर्ष २०२२-२०२३ करीता मंजूर अनुदान | सन २०२२-२०२३ करीता आतापर्यंत वितरित केलेले अनुदान | सध्या वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | ०१ वेतन | ५५८२२८.००० | १११६४४.००० | २२३३०.००० |
| | **एकूण** | **५८०५८१.०००** | **११४७४८.६००** | **२२३३०.०००** |

आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांच्या अधिनस्त कार्यालयांना उक्त लेखशीर्षाखाली अनुदान वितरित करतेवेळी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या नियम/ सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४.०४.२०२२ मधील तरतूदीचे कटाक्षाने पालन करावे. तसेच वित्त विभागाकडून वेळोवेळी प्राप्त होणाऱ्या निर्देशानुसार प्रत्यक्ष खर्चाबाबत कार्यवाही करावी.

सदरचा खर्च "मागणी क्रमांक वाय-०४, २७०२ लहान पाटबंधारे, (०२) भूजल, (००५) अन्वेषण, (०१) संपत्तीचे अन्वेषण व विकास आस्थापना, (०१)(०१) भूजल संपत्तीचे अन्वेषण व विकास आस्थापना (२७०२ ३९१८)(अनिवार्य)" या लेखाशीर्षांतर्गत दर्शविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६२०१२१४३४४७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GANESH NIVRUTTI PAWAR

Digitally signed by GANESH NIVRUTTI PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=805bdef8ce1424c02121cece0d20e917ffa1ef512d7e8fa2e49d93adbb5ad352, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1325A2533F628572438B5FB711C805DE49788678B97015BB0CAC990E3B375423, cn=GANESH NIVRUTTI PAWAR
Date: 2023.06.20 12:54:05 +05'30'

( गणेश पवार )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
२. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, सर्व.
३. सहाय्यक संचालक(मविवलेसे), भुजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.

४. वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, सर्व.
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई/२-नाग़पूर(लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
६. जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व.
७. वित्त विभाग, अर्थसंकल्प १६ (२ प्रती)
८. कक्ष अधिकारी/लेखा अधिकारी, पापु-०४,पापु-२०
९. निवड नस्ती (पापु-१५)